**खॉजा बंदे नवाज एज्युकेशन अँड वेलफेअर सोसायटी,छत्रपती संभाजीनगर संचालित इंदिरा गांधी गर्ल्स माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळा, सिल्लेखाना, छत्रपती संभाजीनगर या शाळेचे, गिरणी मैदान, जिन्सी, छत्रपती संभाजीनगर येथे स्थलांतराबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः माशास्थ ३३२४/प्र.क्र.४३३/२४ /एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०५ जून, २०२४

**वाचा :**

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : माशास्थ ३३२१/प्र.क्र.४०१/एसएम-१ दिनांक २८ जुलै, २०२१.

**संदर्भ :**

१) विभागीय शिक्षण उपसंचालक, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर यांचे जा.क्र.शिउसं/औ/मावि-१/स्थलांतर/२०२२-२३/४३१४, दि.२९.०५.२०२३ रोजीचे पत्र.
२) सहायक निबंधक मा. उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ यांचे दि.१७.०३.२०२४ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

खॉजा बंदे नवाज एज्युकेशन अँड वेलफेअर सोसायटी,छत्रपती संभाजीनगर संचालित इंदिरा गांधी गर्ल्स माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळा, सिल्लेखाना,पैठण गेट छत्रपती संभाजीनगर या उर्दू माध्यमाच्या अनुदानित उच्च माध्यमिक (इ.८ वी ते १२ वी) शाळेचे, गिरणी मैदान, जिन्सी, छत्रपती संभाजीनगर येथे स्थलांतराबाबत उपसंचालक, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर यांचेकडे प्रस्ताव दाखल केला होता. उपसंचालकांनी सदर प्रस्ताव फेटाळल्याने संस्थेने मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र. १२८५३/२०२२ व तद्नंतर अवमान याचिका क्र.२५०/२०२४ दाखल केली आहे. त्याअनुषंगाने संदर्भ क्र.२ अन्वये मा. न्यायालयाने दिलेल्या निदेशांनुसार संदर्भ क्र.१ अन्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त शाळेची इमारत जीर्ण झाल्याने स्थलांतर प्रस्तावित केले आहे. त्यामुळे सदर शाळेचे उपरोक्त ठिकाणी स्थलांतर करण्यास खालील अटी व शर्तीवर मान्यता देण्यात येत आहे.:-

(१) स्थलांतरीत शाळेची किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही. तसेच इच्छुक विद्यार्थ्यांना स्थलांतराच्या ठिकाणी सामावून घेणे आवश्यक राहील.

(२) सदर शाळा मुळ ठिकाणी अनुदानाच्या ज्या तत्वावर कार्यरत होती, त्याच तत्वावर स्थलांतरीत ठिकाणी कार्यरत राहील.

(३) शासनाकडून शाळा, शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/वेतनेतर अनुदान, विद्यार्थी इ.संदर्भात वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ.चे पालन संस्थेने करणे आवश्यक राहील.

(४) शाळेच्या बाबतीत मुळ शासन परवानगीच्या व मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तींमध्ये बदल होणार नाहीत.

(५) प्रस्तुत आदेशांबाबत पुढील कार्यवाही करण्यापूर्वी प्रचलित पध्दतीने अद्ययावत संचमान्यता करण्यात यावी.

(६) सदर स्थलांतरासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे कोणत्याही प्रकारच्या तक्रारी वा आक्षेप आल्यास किंवा स्थलांतरासंदर्भातील अटींचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास स्थलांतर रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. विभागीय शिक्षण उपसंचालक, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर यांनी सदर शाळेच्या स्थलांतराबाबत पुढील कार्यवाही करून केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास अवगत करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६०५१८३७४१०५२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नावाने.

PRAVIN RAJARAM MUNDHE

Digitally signed by PRAVIN RAJARAM MUNDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DC78036626EC580D66C0AC502D43AF5F670B5BA13F51213AD071ACD53714A284, cn=PRAVIN RAJARAM MUNDHE
Date: 2024.06.05 18:50:56 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. विभागीय शिक्षण उपसंचालक, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर
३. शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, छत्रपती संभाजीनगर
४. अध्यक्ष/ सचिव, खॉजा बंदे नवाज एज्युकेशन अँड वेलफेअर सोसायटी,छत्रपती संभाजीनगर
५. निवडनस्ती (एसएम-१).